आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत तरतूदींचे वितरण....
केंद्र हिस्सा २२२५ २२८२
राज्य हिस्सा २२२५ डी ९४१

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२१/ प्र. क्र. ०२/कार्यासन-०६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :-

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१
२) जनजाती कार्य मंत्रालय, भारत सरकारचे पत्र क्र.२००१४/१९/२०१८-एससीएच दि.०६.०५.२०२० व दि.१६.६.२०२१.
३) आदिवासी विकास विभाग, शा.नि.क्र. बीयुडी-२०२१ /प्र.क्र.२/कार्या-६, दि.४.८.२०२१.
४) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. अर्थसं-२०२१ /प्र.क्र.५१/कार्या-१२.

प्रस्तावना :-

आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र.टी-५, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण अंतर्गत केंद्र पुरस्कृत योजना (०२) (०९) भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती केंद्र हिस्सा (२२२५ २२८२), ३४ - शिष्यवृत्ती व विद्यावेतने करिता एकूण रु.२५०००.०० लक्ष तसेच राज्य हिस्सा (२२२५ डी ९४१), ३४ - शिष्यवृत्ती व विद्यावेतने करिता एकूण रु. ८०००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित आहे. मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत अनुसूचित जमाती घटकाकरीता केंद्र हिश्श्याच्या अनुषंगाने सन सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षाकरीता केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र.२ येथील दि.६.५.२०२० रोजीच्या आदेशाद्वारे प्रथम हप्ता रु.४९४९.९० लाख व दि.१६.६.२०२१ रोजीच्या आदेशाद्वारे द्वितीय हप्ता रु.१४००३.६६ लाख असा एकूण रु.१८९५३.५६ लाख निधी मंजूर करण्यात आलेला आहे. त्यापैकी संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये रु.१२५००.०० लाख इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत केलेला आहे. प्रकरणी संदर्भाधीन क्र.४ अन्वये उर्वरीत केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा वितरीत करण्याबाबत वित्त विभागास प्रस्ताव सादर केला असता सन २०२१-२२ अर्थसंकल्पित तरतुदींच्या ६० टक्के मर्यादेत निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत सन २०२०-२१ या वर्षाअखेरची प्रलंबित शिष्यवृत्ती अदा करण्यासाठी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पित तरतुदींमधून ६० टक्के मर्यादेत खालीलप्रमाणे उपलब्ध रु.७३००.०० लाख निधी योजनेचे नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद** | **यापूर्वी वितरीत निधी** | **सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती | २२२५ २२८२ (केंद्र हिस्सा ७५%) | ३४ - शिष्यवृत्ती व विद्यावेतने | २५०००.०० | १२५००.०० | २५००.०० |
| | २२२५ डी ९४१ (राज्य हिस्सा २५%) | | ८०००.०० | ०.०० | ४८००.०० |
| **एकूण** | | | **३३०००.००** | **१२५००.००** | **७३००.००** |

२. सदर एकूण **रु.७३००.०० लाख (अक्षरी रुपये त्र्याहत्तर कोटी फक्त)** इतका निधी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. पोस्ट मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेच्या मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन ऑनलाईन पोर्टलवरील सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षाअखेरपर्यंतची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षनिहाय/ उपलेखाशीर्षनिहाय शिष्यवृत्ती अदा करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांचा तपशील, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९०६/व्यय-१४, दि.२७.१०.२०२१ नुसार प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२११०२८११२१४७१५२४असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijesing Fattesing Vasave

Digitally signed by Vijesing Fattesing Vasave
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, serialNumber=2182f4f20daa6841ab430b2fd812e7b5d3a883e72efa574ca5e29ff528bc8015, cn=Vijesing Fattesing Vasave
Date: 2021.11.01 18:23:08 +05'30'

**( वि.फ.वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
८. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११.सर्व सह सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.